सार्वजनिक आरोग्य सेवांचे तज्ञ संस्थेकडून मूल्यमापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१६/समन्वय-२
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय, संकुल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : २९ एप्रिल, २०२५

प्रस्तावना :-

प्रत्येक जिल्हयामध्ये ग्रामीण तसेच शहरी भागामध्ये विविध प्रकारच्या सार्वजनिक आरोग्य सेवा देण्यात येतात. सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत प्रामुख्याने प्राथमिक तसेच व्दितीय स्तरावर सेवा देण्यात येतात. यासाठी प्राथमिक स्तरावर उपकेंद्र, प्राथमिक आरोग्य केंद्र तसेच द्वितीय स्तरावर जिल्हा रुग्णालय, उप जिल्हा रुग्णालय, ग्रामीण रुग्णालय स्थापित करण्यात आले आहे. शहरी भागामध्ये महानगरपालिकेतर्फे सुद्धा अशया आरोग्य संस्था, दवाखाने, रुग्णालय स्थापित करण्यात आले आहेत. या संस्थामार्फत दिल्या जाणाऱ्या सेवाही निश्चित करण्यात आल्या आहेत. उप केंद्र/ प्राथमिक स्तर येथे माता व बालकांच्या विविध सेवा, असंसर्गिक आजार, स्क्रीनिंग, राष्ट्रीय आरोग्य सेवेचे कार्यक्रम, जोखमीचे रुग्ण ओळखणे आणि त्यांना पुढील उपचारासाठी/सल्ल्यासाठी पाठविणे इ. सर्वसमावेशक सेवा अंतर्भूत आहेत. व्दितीय स्तरावर प्रामुख्याने उपचारात्मक सेवा दिल्या जातात.

केंद्रीय/राज्यस्तरावरील तज्ञ संस्थेच्या मदतीने सार्वजनिक आरोग्य सेवेचे मूल्यमापन करून घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या आरोग्य सेवांचे तज्ञ संस्था/ समितीकडून मूल्यमापन करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

०२. केंद्रीय/राज्य शासकीय तज्ञ संस्थेमार्फत जिल्हयातील सार्वजनिक आरोग्य सेवेचे मुल्यमापन करेल. सदर संस्थेला यापुढे **“आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा”** म्हटले जाईल.

०३. मूल्यमापनाचे उद्देश आणि रुपरेषा (Framework)

जिल्ह्यामध्ये दिल्या जाणाऱ्या सार्वजनिक आरोग्य सेवा यांचे वस्तुनिष्ठ परिक्षण करणे हे मूल्यमापनाचे उद्देश आहे. आरोग्य सेवा मध्ये दोष/ त्रुटी काढणे हे मूल्यमापनाचे उद्देश नसून आरोग्य सेवेचे सर्वकष बाबी समजणे असे आहे. यामध्ये आरोग्य सेवेच्या क्षमता, कमतरता, सेवा देताना येणा-या अडचणी, आरोग्य सेवा दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार व गुणवत्तापूर्ण देण्यात येतात किंवा कसे, त्यामध्ये सुधारणा करुन त्यांचे बळकटीकरण करण्याबाबत आवश्यक उपाययोजना सुचविणे यांचा अंतर्भाव असेल.

मूल्यमापन यंत्रणा आरोग्य सेवेच्या सर्व पैलुंचा अभ्यास करतील. यामध्ये प्राथमिक आणि प्रतिबंधात्मक सेवांचा अभ्यास, मनुष्यबळ, औषध, लेबॉरेटरी सेवा, संदर्भ सेवा, स्क्रीनिंग इत्यादी बाबींचा समावेश राहील. त्याचप्रमाणे रुग्णालय स्तरावर उपचारात्मक सेवा, मनुष्यबळ, औषध, लेबॉरेटरी सेवा इत्यादींचा समावेश राहील. राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमाची अमंलबजावणी चांगल्या सेवा, काळजी क्षेत्रातील

करावयाच्या उपाय योजना - ह्या सर्व बाबी मूल्यमापनामध्ये समाविष्ट राहतील. सार्वजनिक आरोग्य विभाग हे आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा यांच्याशी चर्चा करून मूल्यमापनाच्या अचुक कामाची व्याप्ती ठरवतील.

सार्वजनिक आरोग्य विभाग निश्चित केल्यानुसार मुल्यमापनाचे वेळापत्रक ठरवेल.

०४. **<u>मुल्यमापनाची कार्यपध्दती</u> :-**

आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा निश्चित झाल्यानंतर सार्वजनिक आरोग्य विभाग सर्व जिल्हयातील जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद) आणि आयुक्त महानगरपालिका यांच्याबरोबर बैठक घेतील आणि त्यांना मूल्यमापन यंत्रणा आणि मूल्यमापन पद्धतीबद्दल सविस्तर माहिती देतील. तसेच सर्वांना मूल्यमापन यंत्रणेस पूर्ण सहकार्य करण्याचे निर्देश देतील.

०५. आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा मूल्यमापनासाठी आवश्यक समिती (Team) निश्चित करेल. ज्यामध्ये रोग प्रतिबंधात्मक व सामाजिकशास्त्र तज्ञांशिवाय इतर तज्ञही राहू शकतील. तज्ञ व्यक्तींनी मूल्यमापन प्रक्रिया सुरु करण्यापूर्वी विविध आरोग्य कार्यक्रमांबाबत केंद्रशासन व राज्यशासनाच्या मार्गदर्शक सूचना अवगत करुन घ्याव्यात.

०६. आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणेला आपल्या कामाची कार्यपध्दती स्वतः निश्चित करण्याचे स्वातंत्र्य राहील.

०७. आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा प्रत्येक स्तरावरील (गाव, तालुका, शहरी भाग, दुर्गम / आदिवासी भाग) काही नमुनादाखल (random) निवडलेल्या आरोग्य संस्थांना भेटी देतील आणि त्या संस्थेतील सर्व संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्याशी चर्चा करतील. आरोग्य संस्थांमध्ये उपलब्ध मनुष्यबळ (डॉक्टर्स, नर्सिंग स्टाफ, टेक्निशियन इत्यादी) त्यांचे तांत्रिक ज्ञान, औषधांची उपलब्धता, यंत्रसामुग्रीची उपलब्धता/वापर याबाबत सविस्तर माहिती घेतील. वैद्यकीय अधिकारी, ए.एन.एम., इतर आरोग्य कर्मचारी, आशा स्वयंसेविका इत्यादींना काम करतांना येणा-या अडचणींबाबत चर्चा करतील. रुग्णांशी संवाद साधतील आणि संदर्भसेवा याबाबतही माहिती घेतील. त्या संस्थेतील उत्कृष्ट सेवांचाही अभ्यास करतील. याशिवाय ते लोकांशी, लोकप्रतिनिधीशी, सामाजिक संस्थेच्या प्रतिनिधीशी चर्चा करतील. आरोग्य संस्थांच्या माध्यमातून दिल्या जाणाऱ्या आरोग्य सेवा अपेक्षित माणकांप्रमाणे आहेत किंवा कसे, हे पाहतील. याशिवाय ते प्रत्येक राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांची अंमलबजावणीचेही मूल्यमापन करतील.

०८. **<u>आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा यांना सहकार्य व इतर व्यवस्था</u> :-**

आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा याना मूल्यमापनासाठी लागणारे सर्व लॉजिस्टीक/ ट्रॅव्हल सपोर्ट हे संबंधित जिल्हा परिषद आणि महानगरपालिका/ नगरपालिका यांच्यामार्फत पुरविण्यात येतील.

०९. सदरील कामासाठी मूल्यमापन यंत्रणेतील शासकीय सदस्यांना नियमाप्रमाणे वाहतुक व दैनिक भत्ता त्यांच्या संस्थेकडून अनुज्ञेय राहील.

१०. **<u>मुल्यमापनानंतर करावयाची कार्यवाही</u> :-**

आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा यांनी वरीलप्रमाणे मूल्यमापन केल्यानंतर जिल्हानिहाय अहवाल तयार करावा. महानगरपालिका क्षेत्रासाठी वेगळा अहवाल तयार करण्यात यावा. अहवाल अंतिम करण्यापूर्वी आरोग्य सेवा मूल्यमापन यंत्रणा यांनी संबंधित जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद आणि आयुक्त महानगपालिका आणि उपसंचालक आरोग्य सेवा यांच्या उपस्थितीत आरोग्य विभागातील संबंधित अधिकाऱ्यांसमोर मसुदा अहवालाचे सादरीकरण करावे. सादरीकरण आणि चर्चेनंतर अहवाल अंतिम करण्यात यावा आणि सार्वजनिक आरोग्य विभागास सादर करण्यात यावा.

**११.** अहवालात आढळून आलेल्या उणिवा / त्रुटी यामध्ये सुधारणा करण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभाग हे संबंधित जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद) आणि महानगरपालिका आयुक्त यांना सूचित करतील. अहवालातील शिफारशीवरील कार्यवाही सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत केली जाईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२९१५०७२७३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2025.04.29 15:09:02 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मंबई
८. प्रधान सचिव, वैदयकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव-१, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव-२, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, वैदयकिय शिक्षण व आयुष, वैद्यकिय संशोधन संचालनालय ,मुंबई
१२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१३. जिल्हाधिकारी (सर्व)
१४. संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई/पुणे.
१५. संचालक, वैदयकिय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१७. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१८. उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळे (सर्व).
१९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
२०. जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा / सामान्य रुग्णालय (सर्व)
२१. मुखाधिकारी, नगर परिषद /नगर पंचायत (सर्व)
२२. अधीक्षक, महिला रुग्णालये (सर्व).
२३. अधीक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय (सर्व).
२४. सर्व कार्यासन, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.